# पुनर्जन्म की परकायाप्रवेश

परकायाप्रवेश कायम टिकला तर तो पुनर्जन्म समजला पाहिजे...

## डार्विनचा उत्क्रांतिवादी सिद्धांत खरा आहे काय ? भाग ८
## E Book 173

प्राचार्य अद्वयानंद गळतगे भोज,५९१२६३. जि. बेळगाव (कर्नाटक) भ्र.९९०२००२५८५.

**<u>उत्तरा हुद्दारच्या शरीरात मृत शारदेचा अधून-मधूनचा प्रवेश:</u> (आधीची शारदा मुखोपाध्याय)**




**<u>जसबीर सिंग</u> :- (पूर्वजन्मातील शोभाराम त्यागी)** रसूलपुर (जिल्हा मुझफ्फरनगर उत्तर प्रदेश) येथील गिरधारीलाल जाट याचा साडेतीन वर्षाचा मुलगा जसबीर २२ मे १९५४ रोजी देवीच्या रोगाने मेला वारला. प्रेत दफन करण्यासाठी नेण्यापूर्वी काही तासात त्यात थोडी हालचाल दिसून आली आणि हळूहळू त्यात जिवंतपणाची पुर्ण लक्षणे परत आली. जसबीर पूर्ण जीवंत झाला. काही दिवसानंतर



जसबीर बोलू लागला तो म्हणू लागला की ‘मी वेहेदी गावच्या शंकरचा मुलगा आहे. तिकडे जाण्याची माझी इच्छा आहे.’ तसेच आपण ब्राह्मण असल्याचे सांगून घरचे (जाटचे)अन्न खाण्यास त्याने नकार दिला. तो उपाशी राहू लागल्यामुळे त्याच्या जेवणाची व्यवस्था त्याच गावातील एका ब्राह्मण कुटुंबाच्या घरी शिधा देऊन त्याचे वडील गिरधारीलाल जाट यांना करावी लागली. ही व्यवस्था दीड वर्षे चालली. पण नंतर गिरधारीलाल स्वतच्या घरचेच अन्न त्या ब्राह्मणांच्या घरी देऊ लागला. ही गोष्ट जसबीरच्या लक्षात आली आणि मग तो घरीच जेवू लागला.

जसबीर बोलू लागल्यानंतर त्यांनी सांगितले की मी वेहेदी गावचा ब्राह्मण असून माझे नाव शोभाराम आहे. माझ्या वडिलांचे नाव शंकर आहे. वेहेदी गावात लगत रेल्वेलाईन असून त्याच्याखाली पाण्याचा नाला आहे. हे माझ्या घरासमोर पिंपळाचे झाड आहे. माझ्या मालकीचा लग्नकार्यासाठीचा एक रथ असून त्याला काळा व पांढरा असे दोन बैल मी जुंपतो. एकदा निर्माणा गावाहून लग्न कार्यानंतर परत येत असताना रथातून मी खाली पडलो व माझा मृत्यू झाला. मी ज्याला पैसे उसने दिले होते त्याने गोड अन्नातून विषप्रयोग केल्यामुळे मी रथातून खाली पडलो मेलो. ही घटना २२ मे १९५४ रोजी घडली त्याच दिवशी जसबीर वारला होता व त्याच्या प्रेताची विल्हेवाट रात्र असल्यामुळे सकाळी करण्याचे ठरवले होते. नेमके याच अवधीत शोभारामच्या आत्म्याचा जसबीरच्या मृत शरीरात प्रवेश झाला होता.

गिरधारीलाल जाटनेजसबीरचे  हे अनोखे पुनर्जन्म प्रकरण गुप्त ठेवण्याचा प्रयत्न केला तरी ब्राह्मणांच्या घरी जाट कुटुंबातील जसबीर जेऊ लागल्यामुळे रसूलपुर गावात ते सर्वांना माहित झाले होते. पुढे तीन वर्षानंतर वेळ हे गावातही शंकरलाल त्यागी कुटुंबाला ही बातमी मिळाली. (वेहेदी हे खेडे मुजफ्फरनगरच्या उत्तरेला आठ मैलावर आहे. रसूलपुर हे मुजफ्फरनगरच्या नैऋत्येला बारा मैलावर आहे.)जसबीरने सांगितल्याप्रमाणे वेहेदी गावच्या शंकरलाल त्यागी यांचा २२ वर्षाचा शोभाराम हा तरुण मुलगा रथातून पडून डोक्याला जबर मार बसल्यामुळे गेला होता. मात्र त्याचे कुटुंबीय त्याला शोभारामने कोणाला पैसे उसने दिल्याचे माहित नव्हते. तसेच त्याने लग्नात विषारी अन्न खाल्ल्याचेही माहीत नव्हते. पण जसबीरने पैसे ज्याला उसने दिले

होते त्या माणसाचे नावही त्याने सांगितले होते आश्चर्य असे की त्या माणसाने ते कबूल केले, इतकेच नव्हे तर ते पैसे (रुपये ६००) जसबीरला परत दिले ही गोष्ट शोभारामच जसबीरच्या रूपात अस्तित्वात आला असल्याची त्या माणसाची खात्री पटल्यांची खूण आहे.

नंतर वेहेदीच्या शंकरलाल त्यागींच्या कुटुंबातील व्यक्तींनी रसूलपूरला जाऊन गिरिधारीलाल जाटच्या घरी भेट दिली. त्यावेळी जसबीरने त्या सर्वांना नावासह व नात्याच्या संबंधासह ओळखले.  शिवाय वेहेदीतील त्यागी कुटुंबाच्या घरची माहितीही त्याने बरोबर दिली. काही आठवड्यानंतर जसबीरला वेहेदीला नेण्यात आले. तेथे त्याने त्यागी कुटुंबाचे गावातील ज्या लोकांशी भांडण झाले होते त्या लोकांना व मध्यस्थी केलेल्या माणसाला नावासह ओळखले. तो घरी असताना बाहेरून त्याचा सर्वात लहान चुलता आला. तेव्हा “या गांधीजी” असे म्हणून जसबrरने त्याचे स्वागत केले. ‘तो बिरबल सिंग आहे’ असे तेथील एका उपस्थिताने म्हणताच, ‘पण आम्ही त्याला गांधी म्हणतो’ असेच जसबीर म्हणाला. (बिरबल सिंगच्या गांधीजी सारख्या मोठ्या कानामुळे त्याचे ‘गांधी’ हे टोपण नाव ठेवण्यात आले होते. शोभाराम त्याला गांधीच म्हणत असे) त्यागी कुटुंबात जसबीर इतका रमला की रसूलपूरला जाण्यास त्याने नाखुशी दर्शवली. आपला (शोभारामचा) मुलगा बालेश्वर याला आपल्या अंथरुणात घेवून झोपत असे. सहा वर्षाचा असून सुद्धा तो स्वतला प्रौढ समजत होता व तसाच वागत होता. शेवटी त्याला नाखुषीने े रसूलपुरला परत जावे लागले.

जसबीरने सांगितले की शोभाराम म्हणून आपला मृत्यू झाल्यानंतर मरणोत्तर लोकातील एका अशरीरी साधूने आपल्याला जसबीरच्या शरीराचे आवरण (पांघरूण) घेण्यास सांगितले. जसबिरचे शरीर देवी रोगाने ग्रस्त होऊन तो मेला तरी शोभारामच्या आत्म्याने त्या शरीरात प्रवेश केल्यानंतर देवीचा रोग नाहीसा झाला. फक्त देवीचे व्रण चेहऱ्यावर राहिले. शोभारामच्या ब्राह्मणाच्या सवयी मात्र जसबीरमध्ये मोठेपणी सुद्धा चालू राहिल्या उदा. जानवे वापरणे, धातूच्या पात्रात जेवण घेणे इ.(गिरिघारीलाल जाटचे कुटुंब मातीच्या पात्रात स्वयंपाक व जेवण करीत असे.) असे असूनही जाट जातीच्या मुलीशी लग्न करण्यास तो तयार होता. अद्यापि तो साधू स्वप्नात आपल्याला मार्गदर्शन करीत असतो असे त्याने म्हटले आहे. मृत व्यक्तीच्या आत्म्याला पुढचा जन्म कोठे घ्यावयाचा, याचे साधूकडून मार्गदर्शन झाल्याची जसबीर सारखी उदाहरणे थायलंड व ब्रह्मदेश या देशात अधिक आढळून

येतात (Twenty Cases Suggestive of Reincarnation - Ian Stevenson,1974 )

येथे जसबीरच्या प्रकरणाला पुनर्जन्म प्रकरण समजावे काय असा प्रश्न उपस्थित केला जाऊ शकतो. कारण मृत्यू पावलेला शोभाराम दुसऱ्या एखाद्या कुटुंबातील मातेच्या पोटी सामान्य रीतीने जन्म घेतलेला नसून जसबीर या भिन्न व्यक्तिच्या मृत शरीरात अगांतुकपणे प्रवेश केलेला आहे. त्यामुळे त्याला 'परकायाप्रवेश' किंवा 'झपाटणे' किंवा 'संचार '(possession) का समजू नये असे विचारले जाऊ शकते. तथापि या प्रकरणाला 'परकायाप्रवेश' न समजता पुनर्जन्मच समजले पाहिजे याचे कारण समजण्यासाठी परकायाप्रवेशाचे एक प्रत्यक्ष घडलेले उदाहरण पाहू.

https://www.reincarnationresearch.com/past-life-story-with-a-spirit-being-raising-of-the-dead-karma-walk-in-incarnation-case-of-sobha-ram-jasbir-jat/

**वाटसेका एका शहरातील एक परकाया प्रवेशाचे प्रकरण:-** अमेरिकेच्या इलिनॉय प्रांतातील वाटसेका या शहरात मेरी रोफ या नावाची मुलगी ५ जुलै १८३५ रोजी मेली. त्याच शहरात १६ एप्रिल १८६४ रोजी जन्मलेल्या ल्युरन्सी व्हेनुम नावाच्या मुलीच्या शरीरात (तिच्या १३व्या वयवर्षी) मेरी रोफने प्रवेश केला आणि ल्युरन्सी व्हेनुम नाहीशी झाली. आपण मेरी रोफ असल्याचे व आपले घर अमुक ठिकाणी असल्याचे ती सांगू लागली. तिथे तिला नेल्यानंतर तेथील माणसांना (आई वडील, लहान बहीण इत्यादी ना) तिने त्यांची नावे घेऊन हाका मारल्या. इतकेच नव्हे तर मेरीच्या जीवनातील अगदी बारीक सारीक घटना सुद्धा तिने तपशीलवार सांगितल्या. आपण तेथेच राहणार असा त्याने आग्रह धरला, व मेरीने झाकून ठेवलेल्या व इतर कोणालाही माहित नसलेल्या वस्तू ही तिने काढून दाखवल्या. तिच्या स्वभाववैशिष्ट्याची ओळख पटल्यामुळे 'ल्युरन्सी'ला मेरीच्या आई-वडिलांनी 'मेरी' म्हणून आपल्या घरी ठेवून घेतले, व त्याला तिच्या आई-वडिलांची ही संमती दिली. बरोबर तीन महिने दहा दिवसांनी 'मेरी' एकदम निघून गेली व ल्युरन्सी परत आली. आणि आपण कोठे आहोत हे तिला कळेना. तिला मेरीच्या आईवडिलांनी परत तिच्या तिच्या (ल्युरन्सीच्या)आई-वडिलांकडे पाठवून दिले.(Watseka Wonder- E .W> Stevens, 1887)




या प्रकरणात मृत झालेल्या मेरीने ल्युरन्सीच्या शरीरात प्रवेश करून  एका अर्थाने 'पुनर्जन्म' घेतलेला असला तरी तिने नंतर ते शरीर सोडलेले असल्यामुळे हे खऱ्या अर्थाने पुनर्जन्म प्रकरण होऊ शकत नाही. हे परकायाप्रवेशाचेच(झपाटल्याचे possessionचेच) प्रकरण समजले पाहिजे. हे झपाटणे नेहमीप्रमाणे अल्पकाळ टिकण्याऐवजी सव्वातीन महिने, म्हणजे थोडे दीर्घ काळ टिकले आहे, इतकेच. मेरी रोफ ल्युरन्सीच्या शरीरात तहहयात राहिली असती तर तो तिचा पुनर्जन्म असल्याचे म्हंटले असते. असे दुसऱ्याच्या शरीरात (यावज्जीव) राहण्याचा प्रकार ही घडू शकतो. असले एक भारतातील प्रकरण पाहू.

**मृत शिवाचा मृत सुमित्रेच्या शरीरात पुनर्जन्म:-** श्री. जगदीश ठाकुर नावाच्या गृहस्थाची २२ वर्षे वयाची सुमित्रा नावाची पत्नी १९ मे १८८५ रोजी फारुखाबाद जिल्ह्यातील छिब्रामाऊ तालुक्यातील शरीफपूर या खेड्यात आजारानंतर मरण पावली. तिचे दहन करण्यासाठी तिला स्मशानाकडे नेत असता तिच्यात हालचाल दिसू लागली व तब्बल पाऊण तासाने ती परत जिवंत झाली, व मी 'शिवा' आहे असे म्हणू लागली. तिने अवतीभोवती आश्चर्यचकित होऊन पाहिले. चौकशीअंती तिला खरा प्रकार कळला. पण मी 'सुमित्रा' नसून 'शिवा' आहे असे ते म्हणू लागले लागली. तिने आपल्या सासरच्या लोकांची माहिती दिली. माझे वडील रामसिया त्रिपाठी असून ते इटावा येथे शिवनारायण कॉलेजमध्ये शिक्षक आहेत. 'माझ्या वडिलाकडे मला घेऊन चला' असा तिने आग्रह धरला. सर्व लोक दिग्मूढ झाले. तिकडे दिबियापुर या शिवाच्या सासर मध्ये तिचा मृतदेह रेल्वेखाली सापडला होता. सासरच्या लोकांनी शिवाने आत्महत्या केली असे सांगण्यास सुरुवात केली होती. त्यांना संशयाने

पकडण्यात आले होते. (पण नंतर पुराव्याच्या अभावी त्यांना सोडून देण्यात आले) शिवाच्या वडिलांना शरीफपूरची माहिती मिळताच ते धावून आले. त्यांना पाहताच शिवा त्यांच्या गळ्यात पडून रडू लागली आणि नणंदेने मला मारले, असे सांगितले. तिला इटाव्याला नेले, तेव्हा माहेरच्या सर्व लोकांना तिने ओळखले. ती सासरला जाण्यास नाखूश तर होतीच, पण आपल्या दोन मुलांना घेऊन येण्याचा आग्रह तिने धरला. सुमित्राच्या ११ महिन्याच्या मुलाला सांभाळ करण्याची तयारीही तिने दर्शवली. सुमित्रा व शिवा यांची मृत्यूसमयी वये अनुक्रमे २२ व २३ होती. सुमित्रा निरक्षर होती व शिवा शिक्षित होती. आता 'सुमित्रा' लिहू शकते व तिचे हस्ताक्षर शिवाच्या हस्ताक्षर अशी तंतोतंत जुळत असल्याचे आढळून आले आहे. (Proceedings of All India Conferenceon Reincarnation, March1987, Allahabad))

या प्रकरणात मृत शिवाने वृत्त सुमित्राच्या शरीरात आगंतुकपणे प्रवेश केलेला असला तरी - म्हणजे ल्युरन्सीच्या शरीरातील मेरी रोफ प्रमाणे ती परकायाप्रवेश असली तरी - म्हणजे जसबीरच्या शरीरातील शोभारामप्रमाणे ते शरीर तिने नंतर सोडून दिलेले नाही. परकायाप्रवेश कायम टिकला तर तो पुनर्जन्म समजला पाहिजे, हे या उदाहरणावरून स्पष्ट होईल. आता खुद्द महाराष्ट्रातील नागपूर शहरात असे एक प्रकरण घडले आहे की ज्यामध्ये झपाटणे परकाया प्रवेश व पुनर्जन्म यातील फरक ठरवणे सकृद्दर्शनी तरी कठीण ठरत असल्याचे आढळून येते. हे प्रसिद्ध 'उत्तरा हुद्दार'चे प्रकरण होय. हे अनोखे प्रकरण थोडक्यात पाहू.

**उत्तरा हुद्दारच्या शरीरात मृत शारदेचा अधून-मधूनचा प्रवेश: (आधीची शारदा मुखोपाध्याय)** पुण्याच्या( कै.) प्रा. व. वि. अकोलकर या प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञांनी उत्तरा हुद्दारचे हे प्रकरण १९७५/७६साली तपासले असून त्याविषयी त्यांनी नागपूरमध्ये केलेल्या एका भाषणाची ध्वनिफीत प्रस्तुत लेखकाला पुणे मुक्कामी प्रथम ऐकवली. पुढे १९९२ साली 'जर्नल ऑफ अमेरिकन सोसायटी फोर सायकिक रिसर्च, व्हॉल्युम 86मध्ये 'Search for Sharada: Report of a case and its investigation' या मथळ्याखाली हे प्रकरण प्रसिद्ध केले( त्याची प्रत थोड्या विस्ताराने परामानसशास्त्र या १९९२ साली प्रसिद्ध केलेल्या आपल्या मराठी पुस्तकात त्यांनी 'परिशिष्ट २' मधून प्रसिद्ध केली आहे)

नागपूरच्या कु. उत्तरा बाळाजी हुद्दार ( जन्म १९४१, शिक्षण एम. ए.) तिचे व्यक्तिमत्व वयाच्या ३३व्या वर्षापासून अधून मधून लोप पावू लागले व स्वतःचे शारदा नाव सांगणाऱ्या बंगालच्या बरद्वान येथील ब्रजेन्द्र नाथ चटोपाध्याय या

पंडिताची २३ वर्षाची मुलगी व व  शिवपुर (हल्ली बंगलादेश मधील खुलनाजवळचे गाव) येथील वैद्य विश्वनाथ मुखोपाध्याय यांची पत्नी असल्याचे सांगणाऱ्या एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीच्या स्त्रीचे व्यक्तिमत्व तिच्या (उत्तरेच्या) शरीराचा ताबा घेऊ लागले. म्हणजे आपण शारदा असल्याचे ती सांगू लागली.  ती सांगू लागली की वयाच्या २३व्या वर्षी सप्तग्राम( कलकत्त्याच्या उत्तरेला ३० किलोमीटर अंतरावरील गाव) या आपल्या मावशीच्या गावी फुले वेचित असताना मग अष्टमीच्या दिवशी आपल्या उजव्या पायाच्या अंगठ्याला साप चावल्यामुळे सात महिन्यांची गरोदर असताना आपला मृत्यू झाला. हे सर्व ती बरद्वान च्या जुन्या बंगाली बोलीभाषेत सांगे - जी भाषा हल्ली बंगालमध्ये कोणी बोलत नाहीत. हल्ली भारतात ईस्ट इंडिया कंपनीचे राज्य आहे असेही समजे. विजेचे दिवे, रेडिओ, पंखे, गॅस स्टोव्ह, मोटारी यांची तिला ओळखत नसल्यामुळे त्याकडे ती भितीयुक्त कुतूहलाने पाही. टेप रेकॉर्डरला ती डाकन (स्त्री पिशाच) म्हणे. उत्तरेच्या घरातील लोकांना ती परके समजे. तिला स्नानगृह, संडास दाखवावा लागे. अंतर्वस्त्र न वापरता केवळ (बंगाली पद्धतीने) साडी नेसे.  मासिक पाळीच्या वेळी केळीचे पान व कापूस मागून वापरे. देवपूजा करताना रांगोळीने वाघावर बसलेल्या दुर्गादेवीची व नागाच्या फण्या खालील शिवलिंगाची आकृती काढी. व बंगाली स्तोत्रे म्हणे. आपल्या पतीविषयी ती (वर्तमान काळात) सांगे कि ते वैद्य आहेत व घोड्यावरुन रुग्ण तपासायला जातात. घरी विद्यार्थी शिकण्यासाठी येतात व कामाच्या रेट्यामुळे आपण थकलो की स्वामी( पती) आपल्यावर रागावतात व मारतात. नागपूरला स्वामींना( पतीला) भेटण्यासाठी दुर्गादेवीने आपल्याला पाठवले असल्याचे ती सांगे.

उत्तरेचे शारदे मध्ये नेहमी शुद्ध किंवा वद्य अष्टमीला रूपांतर होत असे. हे रूपांतर १९७४ ते १९८१ पर्यंत अधूनमधून २८ पेक्षा जास्त वेळा झालेले असून शारदा अवस्था एक दोन दिवसापासून ते १५ ते वीस दिवस टिकत असे. एकदा एक्केचाळीस दिवस टिकली.उत्तरेला शारदे विषयी काही माहीत नसे. ती अवस्था निघून गेल्यानंतर इतरांच्या कडून तिच्या विषयी माहिती तिला कळत असे. शारदेला तर उत्तरा म्हणून कोणी आहे हेच माहीत नव्हते.




शारदेने आपल्या विषयी सांगितलेल्या माहितीवरून व स्वतंत्रपणे केलेल्या शोधातून शारदा ही व्यक्ती सुमारे १८०७ ते १८२१च्या दरम्यान बरद्वान( माहेर) व शिवपुर( सासर) येथे जीवन कंठल्याचे सिद्ध होते. १४ एप्रिल १८२८ चे कंकणाकृती सूर्यग्रहण आपण पाहिल्याचे तिने म्हटले आहे. तसेच तिने सांगितले त्या आपल्या नात्यातील लोकांच्या नावांची वंशावळी सापडली आहे. त्यावर त्याचे वारसदार हल्ली बरद्वान व शिरपूर मध्ये आहेत. आता प्रश्न असा की १५० वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या एका मृत बंगाली स्त्रीने उत्तरा हुद्दार या एका महाराष्ट्रातील स्त्रीच्या शरीरात असा मधूनमधून तोही विशेषतःप्रत्येक महिन्याच्या अष्टमीला प्रवेश का करावा - तिच्या शरीराचा ताबा का घ्यावा? या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी उत्तरा हुद्दारचे चरित्र आपल्याला समजून घेणे आवश्यक आहे.

उत्तरेच्या आईने प्रा. अकोलकर यांना सांगितले की उत्तरेला गरोदर असताना आपल्याला उजव्या पायाच्या अंगठ्याला साप चावल्याचे स्वप्न पडले होते. उत्तरा जन्मल्यानंतर मात्र हे स्वप्न पुन्हा पडले नाही.(हे स्वप्न तिने उत्तरेला कधीच सांगितले नाही) शारदा गरोदर असताना तिच्या उजव्या पायाच्या अंगठ्याला साप चावल्यामुळे वारली असे तिने सांगितल्याचा वर उल्लेख आलाच आहे.उत्तरेच्या आईच्या स्वप्नावर प्रा. अकोलकर यांनी काहीही भाष्य केलेले नसले तरी शारदेच्या व्यक्तिमत्वाची उत्तरेत होणारी अभिव्यक्ती समजण्याच्या दृष्टीने हा मुद्दा अत्यंत महत्त्वाचा आहे. कारण संत तुकारामांनी म्हटल्याप्रमाणे (आणि प्रत्यक्षात ही वस्तुस्थिती असल्यामुळे) ‘गर्भाचे आवडी मातेचा डोहळा I तेथींचा जिव्हाळा तेथे बिंबे II’ म्हणजे गर्भाला (गर्भातील व्यक्तीला) आवडणारी गोष्टच, तिचा अनुभवच, मातेमध्ये गरोदरपणी प्रकट होतो. (गरोदरपणी) अंगठ्याला साप चावल्याचा शारदेचा अनुभव उत्तरेला गरोदर असताना उत्तरेच्या आईला स्वप्नाद्वारे अनुभवास यावा ही ह्या दृष्टीने गोष्ट

महत्त्वाची आहे. ती हे सूचित करते की शारदेचा आत्माच उत्तरेच्या रूपाने उत्तरेच्या आईच्या गर्भात अवतरित झाला आहे. याला पूरक अशा अनेक गोष्टी उत्तरेच्या जीवनात व तिच्या नातेवाईकात आढळून येतात. उदा. उत्तरेला बंगाली शिकण्याची तीव्र इच्छा होती आणि तिने बंगाली भाषेची तोंडओळखही करून घेतली होती. बंकिमचंद्र, शरचंद्र चटोपाध्याय यांच्या कादंबऱ्या (मराठीत भाषांतरित झालेल्या) तिने वाचल्या होत्या. त्यांच्यावर एक लेख तिने म. टाइम्समध्ये लिहिला होता. तिच्या वडिलांना बी. सी. पाल, चित्तरंजन दास, अरविंद घोष या बंगाली क्रांतिकारक याबद्दल फार आदर व कौतुक वाटे. उत्तरेचे मामा( बी.बी. कानडे) व तिची चुलत बहीण( सौ सोनाल) हे बंगाली बोलू शकत होते. स्वतःउत्तरेला बंगालच्या परिसराची (देवळे शिवलिंग ई) स्वप्न पडले. अंतर्मनामध्ये दुर्गा देवीचे स्तवन चालू असल्याचा तिला अनुभव येई. २४व्या वर्षी तिला लग्न करण्याची इच्छा झाली, तेव्हा तिला ध्यानावस्थेत तर कधी स्वप्नात सडपातळ, उंच, गोऱ्या रंगाच्या पुरुषाचे दर्शन होई. शारदा अवस्थेत येण्यापूर्वीचा आपला अनुभव तिने पुढील प्रमाणे लिहिला आहे: ‘मधून मधून एक घर, देव्हारा, पूजा, वाट पाहणे, रात्री (ते) घोड्यावरून येणे, स्पर्श, पाय चेपणे, दचकणे, बिलगणे, स्वस्त होणे, पुन्हा दुरावा, न पाहिलेली गावे व माणसे, नदीवर अंघोळ करणाऱ्या सासुबाई, दासदासी, कुणीतरी मारणे, (व) मला अपमान वाटणे.’

शारदेचे पती घोड्यावरुन जात, थकल्यावर रागे भरत, मारत असे ती सांगत असल्याचा वर उल्लेख आलाच आहे. उत्तरेचे वरील सर्व अनुभव शारदा ची उत्तरेच्या रुपाने जन्मलेल्या च्या अनुमानाला पुष्टी देतात. तथापि शारदेच्या व्यक्तिमत्वाने उत्तरेच्या शरीरात वरचेवर प्रवेश का करावा, तिचा ताबा का घ्यावा या प्रश्नाचे उत्तर त्यामुळे मिळत नाही मात्र त्याचे उत्तर पुढील प्रत्यक्ष घडलेल्या घटनांमुळे मिळू शकते.

उत्तरेला लग्न करण्याची चोविसाव्या वर्षी इच्छा झाल्याचे वर सांगितलेच आहे. तिने आपल्याला असे वाटल्याचे म्हटले आहे की प्रकृती रूपी स्त्री पुरुषाशिवाय अर्थपूर्ण होऊ शकत नाही. (हा सांख्य शास्त्राचा विचार आहे.) याविषयी प्रा अकोलकर यांनी तिचे म्हणणे तिच्याच शब्दात पुढीलप्रमाणे मांडले आहे: ‘if only my ego energy could incorporate itself into some man's activity, it could be saved to end the fruitlessness of the human life and to render it fruitful.’ स्त्री जीवनी शक्ती पुरुष जीवनी शक्तित मिसळल्यामुळे घटित होणाऱ्या मातृत्वामुळे स्त्रिचे जीवन सुफळ होते‘ हा विचार यातून व्यक्त होतो. तिच्या मनात लग्नाचा विचार याच दृष्टीने आला होता. त्यावेळी ती ‘फ’ (टोपण नाव)

या आपल्या सहाध्यायी याकडे आकर्षित झाली, आणि त्याच्याकडे लग्नाची मागणी केली. पण त्याला त्याने प्रतिसाद दिला नाही स्पष्ट नकार दर्शवला. त्यामुळे यामुळे ती अतोनात वैफल्यग्रस्त झाली. यानंतर वयाच्या २९व्या वर्षी डॉक्टर 'जी'( टोपण नाव) या होमिओपॅथी डॉक्टरकडे ( तिच्याच  शब्दात लोह चुंबकाकडे लोखंडाचे कण आकर्षित व्हावेत तसे ती आकर्षित झाली. डॉक्टर 'जी' ५० वर्षाचे होते व ते एक अध्यात्मिक आश्रम चालवत होते. त्यांनी तिला जेव्हा तपासले तेव्हा तिला त्यांचा स्पर्श ओळखीचा वाटला (मागच्या जन्मी आपला 'जी' संबंध होता.

असे तिने म्हटल्याचे 'जी'नी उत्तरेच्या वडिलांना सांगितले आहे) दोघांमध्ये वयाचे मोठे अंतर असले तरी रामकृष्ण परमहंस यांच्या व शारदा देवींच्या त्यांच्यात वयाचे मोठे अंतर असूनही जसा विवाह आध्यात्मिक संबंध होता, तसा संबंध त्यांच्याशी विवाह करून ठेवावा अशा विचाराने तिने त्यांच्याशी विवाहाची मागणी केली.  आपण आपली मातृत्वाची इच्छा २-४ दिवसांचे एखादे अर्भक दत्तक घेऊन पूर्ण करू असे तिने ठरवले. पण डॉक्टर 'जी' नी स्पष्ट नकार दर्शवला. उत्तरेला आलेल्या हा वैफल्याचा दुसरा मोठा धक्का होता. आणि त्याच वेळी नेमके शारदेच्या व्यक्तिमत्त्व आणि तिच्या शरीरात ताबा घेण्यास सुरुवात केली. याविषयी प्रा.. अकोलकर यांचा निष्कर्ष असा आहे: "...the disappointment and severe frustration regarding marriage to 'f' and then the homeopatic physician('Z') that occurred when Uttara was in the prime of her youth... resulted in in regression to Sarada strathum. Sarada (thus) took control (of Uttara) so that she could serve an important function... Sharda provided a role that Uttara very much wanted to live. (JASPR Vol. 86,July1992P.246)

अशा रीतीने शारदेचे जीवन जगण्याच्या तीव्र अंतर्मनाच्या इच्छेतून उत्तरेचे शारदेत व्यक्ती रूपांतर झाले. शारदा सात महिन्याच्या गरोदरपणात मातृत्व येण्यापूर्वी (अष्टमीला) सर्पदंशाने मेली तरी या जन्मात उत्तरा दोनचार दिवसांचे अर्भक दत्तक घेऊन आपली मातृत्वाची इच्छा सुफळ करू इच्छित होती. अशा रीतीने शारदेचा उत्तरेत परकाया प्रवेश झालेला असला तरी तो उत्तरेच्या रूपातील शारदेच्याच पुनर्जन्म झालेल्या शरीरातील '<u>परकायाप्रवेश</u>' आहे. येथे '<u>परकाया</u>' म्हणजे आपलेच पण पुनर्जन्मातील '<u>दुसरे शरीर</u>' समजावे लागते. 'दुसऱ्याचे - परकीय व्यक्तीचे - शरीर समजूनये. अशा रीतीने एक 'परकायाप्रवेशाचे'(संचाराचे, Possessionचे), व त्याच वेळी पुनर्जन्माचे असे दुपदरी अनोखे प्रकरण आहे.

टीप -  शारदेच्या मृत्यूनंतर तिचा उत्तरा म्हणून पुनर्जन्म झाल्यानंतर ‘शारदा’ ही शारदा म्हणून राहत नाही. तेव्हा ती उत्तरेच्या शरीरात कशी प्रकट होईल असा प्रश्न काही वाचकांना पडेल पडणे शक्य आहे. ब्रह्मविज्ञानानुसार विश्वातील सर्व घटना व व्यक्ती अगोदरच आकाश तत्त्वात अदृश्य पण मूर्त स्वरूपात चित्रित केल्या गेलेल्या असतात. त्या कालनिरपेक्ष असल्यामुळे कधीच नष्ट होत नाहीत.( छां. उप. ८.१.३)

....

**अन्य जमवलेली माहिती-**

१) मुळाक्षरे देवत्वाची उत्तरा हुद्दार यांनी लिहिलेले पुस्तक इथे मिळू शकेल.




**शारदा रूपातील तिचे बंगाली हस्तलेखन  उत्तरारुपातील तिच्या वडिलांनी माझ्या देखत हे घडले असे लेखी दिले आहे.**

Xenoglossy झेनोग्लॉसी म्हणजे कधीही न शिकलेल्या भाषेत बोलण्याची किंवा लिहिण्याची क्षमता.

"Written by Sharda on 8-4-76 in presence of
M/S Balaji Huddar & R. K. Sinha

[Signed]
Balaji Huddar






Reincarnation, at least as I conceive it, does not nullify what we know about evolution and genetics. It suggests, however, that there may be two streams of evolution -- the biological one and a personal one -- and that during terrestrial lives these streams may interact.

— Ian Stevenson —

AZ QUOTES

**Reincarnation Research** [Case Of Uttara Huddar]

......